वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत परभणी मुख्यालयातील "पद्मश्री शामराव कदम विश्रामगृह" इमारत दुरुस्ती व नुतनीकरणाच्या कामास <u>प्रशासकीय मान्यता देणेबाबत</u>.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: मकृवि-१२२४/प्र.क्र.१५७/७-अे,**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार,मुंबई - ४०००३२.
दिनांक: २२/०८/२०२४.

**संदर्भ :** १) उद्योग,उर्जा व कामगार विभाग,शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि.०१.१२.२०१६.
२) उद्योग,उर्जा व कामगार विभाग,शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दि.२४.०८.२०१७.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२०.०९.२०१९.
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम(भाग-२), दि.१७.०४.२०१५.
५) संचालक,महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे यांचे जा.क्र.मकृप/सासावि/११६ वी बैठक/२१५९/२०२४,दि.१५.०७.२०२४ रोजीचे पत्र.

**<u>प्रस्तावना :-</u>**

वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत परभणी मुख्यालय येथे असलेल्या पद्मश्री शामराव कदम विश्रामगृहाच्या इमारतीची दुरावस्था झालेली असल्याने, सदर विश्रामगृहाच्या इमारत दुरुस्ती व नूतनीकरणाचा प्रस्ताव संदर्भ क्र.५ येथील पत्रान्वये शासनास प्राप्त झाला होता.

वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी येथील पद्मश्री शामराव कदम विश्रामगृहाच्या इमारतीचे बांधकाम सन १९७४-७५ मध्ये करण्यात आलेले आहे. सदरची इमारत ही ४८ वर्षे जुनी इमारत आहे. सद्यस्थितीत या विश्रामगृहाची दुरावस्था झाली असून विश्रामगृह वापरात नाही.

सन २०२३ मध्ये या इमारतीचे संरचनात्मक परीक्षण (Structural Audit) करण्यात आलेले आहे. संरचनात्मक परीक्षण अहवालामध्ये विश्रामगृहाच्या इमारतींना बऱ्याच ठिकाणी तडे गेल्याचे व बाहेरील बाजूचे प्लास्टर निघाल्याचे नमूद आहे. तसेच, इमारतीच्या छतामधून पाणी गळत असून, ओलसरपणा आणि पाण्याची गळती हे नुकसानीचे प्रमुख कारण असल्याने इमारतीला वॉटरप्रूफिंग, इमारतीची दुरुस्ती व नूतनीकरण करणे आवश्यक असल्याचे संरचनात्मक परीक्षण

अहवालामध्ये नमूद केले आहे. संरचनात्मक परीक्षण अहवालाच्या अनुषंगाने पद्मश्री शामराव कदम विश्रामगृहाच्या इमारतीच्या दुरुस्ती व नूतनीकरणाच्या स्थापत्य कामाचे अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,नांदेड यांच्या तांत्रिक मान्यतेसह अंदाजपत्रक शासनास प्राप्त झाले आहे. त्यासअनुसरुन वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी अंतर्गत परभणी मुख्यालय येथील पद्मश्री शामराव कदम विश्रामगृहाच्या इमारत दुरुस्ती व नूतनीकरणाच्या कामाच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी अंतर्गत परभणी मुख्यालय येथील पद्मश्री शामराव कदम विश्रामगृहाच्या इमारत दुरुस्ती व नूतनीकरणाच्या कामासाठी लागणाऱ्या खर्चाच्या रु.२५०.०० लाख (अक्षरी रुपये दोन कोटी,पन्नास लाख मात्र) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. (सविस्तर अंदाजपत्रक सोबतच्या **<u>परिशिष्ट-१</u>** नुसार राहील).

१. काम सुरु करण्यापूर्वी सदर अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाचे संबंधित अधिक्षक अभियंता व मुख्य अभियंता यांच्याकडून साक्षांकित करण्यात यावे.
२. सदरची कामे प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेतच पूर्ण करावीत.
३. पद्मश्री शामराव कदम विश्रामगृहाच्या इमारत दुरुस्ती व नूतनीकरणाचे काम सार्वजनिक बांधकाम विभागाच्या व शासनाच्या प्रचलित नियमानुसारच करावे.
४. सदर विश्रामगृह इमारतीच्या संरचनात्मक परीक्षण (Structural Audit) अहवालात नमूद बाबींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.
५. सदर देखभाल व दुरुस्तीची कामे यासाठी मंजूर व उपलब्ध नियतव्ययातून खर्च करावा व उपलब्ध निधीच्या मर्यादेतच टप्प्याटप्प्याने कामे हाती घेण्यात यावीत. अतिरिक्त दायित्व निर्माण करण्यात येवू नये.
६. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/ईमा-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.
७. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग,शासन निर्णय दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.
८. प्रस्तावित इमारतींचे जोते क्षेत्रफळ कर्मचारीवर्ग व शासकीय इमारती यांच्या अनुज्ञेय मानकाप्रमाणे असल्याची खातरजमा करण्यात यावी.
९. प्रस्तावातील खरेदीशी संबंधीत बाबींकरीता उद्योग,ऊर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि.०१/१२/२०१६ व वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील कार्यपध्दती व अटींचे पालन करावे.
१०. सदर विश्रामगृह इमारतीच्या संरचनात्मक परीक्षण (Structural Audit) अहवालातील सूचनांचे पालन करावे.

२. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्रमांक डी-३, २४१५ कृषि विषयक शिक्षण व संशोधन, ०१, पीकसंवर्धन,१२० इतर संस्थांना सहाय्य, (००) (०९) वसंतराव नाईक मराठवाडा कृषि

विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) (२४१५ ०१०५) ३५,भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान” या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

**३.** हे आदेश, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दि.२०.०९.२०१९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ चा भाग-पहिला, उपविभाग-पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०८२२१७०२३४३९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: CN = PRATIBHA MADHAV PATIL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = AGRICULTURE AND ADF DEPARTMENT
Date: 2024.08.22 17:18:38 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
२. महासंचालक,महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे.
३. कुलगुरु/कुलसचिव,वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी.
४. वित्तीय सल्लागार, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
५. विद्यापीठ अभियंता,वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी.
६. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर.
७. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी /उपकोषागार अधिकारी,परभणी,जि.परभणी.
९. सहायक लेखाधिकारी, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी.
१०. मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
११. उप मुख्य लेखापरीक्षक स्थानिक निधी लेखा (वरिष्ठ), कोकण भवन, नवी मुंबई.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१४. कार्यासन ७-अे (निवडनस्ती).

कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई शासन निर्णय क्र.मकृवि-१२२४/प्र.क्र.१५७/७-अे, दि.२२/०८/२०२४ चे सहपत्र.

परिशिष्ट-१

**Name Of Work :-Repair and Renovation of Padma Shri Shamrao Kadam Guest House Parbhani, under VNMKV, Parbhani**

**RECAPITULATION SHEET**

| Sr. No. | Particulars of Scope | Unit Rate Norms Rs.Per (Sqm/Meter/LS etc) | Cost in Rs. |
|---|---|---|---|
| **(A)** | **Essential Items** | | |
| 1 | Building Proper (Built-up Area of Building - Sqm) | | |
| | | As per Detailed Estimate | 12604737.00 |
| | Quality Control Charges | | 0.00 |
| | Fuel Gas Pipeline | | 0.00 |
| | Bio Digester | | 0.00 |
| | Rain water Harvesting (300 sqm@ Rs.600/Sqm) | | 0.00 |
| | Solar Energy System (PV Solar Plant) | | 0.00 |
| | Ramps for Handicaps | | 0.00 |
| | Furniture minimum (Rs. 5000/sqm) | LS | 4000000.00 |
| | | **Sub Total** | **16604737.00** |
| 2 | Water supply and sanitation (5% Civil Cost) | | 0.00 |
| 3 | **Electrification** | | |
| | a) Internal | LS | 2000000.00 |
| | b) External | | 0.00 |
| | Fire fighting Arrangements (1% civil cost) fire extingushers | | 0.00 |
| | | **Sub Total (A)** | **18604737.00** |
| **(B)** | **Miscellaneous Items** | | |
| 1 | Compound wall & Gate (400 rgm @ Rs.5000/Rgm) | | 0.00 |
| 2 | Internal road C.C. (50Rgm @ Rs.3000/Rgm) | | 0.00 |
| 3 | Development of Ground | | 0.00 |
| 4 | Parking Arrangement as per Layout (200 sqm@ Rs. 500/sqm) | | 0.00 |
| 5 | Ambulance & Generator Rooms | | 0.00 |
| 6 | Land Scaping (Gardening) | LS | 1500000.00 |
| 7 | Royalty | | 27731.00 |
| | | **Sub Total (B)** | **1527731.00** |
| **(C)** | **Optional Items** | | |
| 1 | U/G Water Tank for RWH | | 0.00 |
| 2 | Water Main Storage, Bore well & Pump House etc | | 500000.00 |
| 3 | Air-conditioning | | 0.00 |
| 4 | Lifts | | 0.00 |
| 5 | External Toilets (40sqm@Rs.24,610/Sqm) | | 0.00 |
| 6 | Pumps, Generators, Transformers, MSEDCL | | 0.00 |
| 7 | CCTV | | 0.00 |
| | | **Sub Total (C)** | **500000.00** |
| **(D)** | **Provisions** | | |
| 1 | G.S.T. 18% of **(A)** | | 3348853 |
| 2 | Contingencies 3% of **(A)** | | 558142.00 |
| 3 | Labour Insurance 1% of **(A)** | | 186047.00 |
| 4 | Technical Sanction 1.25% (A) | | 232559.00 |
| 5 | G.S.T. 18% on (Technical Sanction) | | 41861.00 |
| | | **Sub Total (D)** | **4367462.00** |
| | | **Total Cost of Project (A+B+C+D)** | **24999930.00** |
| | | **Say in Lacs** | **250.00** |

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: CN = PRATIBHA MADHAV PATIL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = AGRICULTURE AND ADF DEPARTMENT
Date: 2024.08.22 17:18:54 +05'30'

( प्रतिभा पाटील )

उप सचिव, महाराष्ट्र शासन.